**डोंबिवली औद्योगिक क्षेत्रातील अतिधोकादायक व धोकादायक रासायनिक कारखाने स्थलांतरीत करणे व तसेच विनापरवाना कारखाने बंद करण्यासंदर्भात कृती आराखडा (Action Plan) समिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय क्र. आयडीसी २०२०/ प्र.क्र. १६९/उ-१४.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई.- ४०००३२.
दिनांक :- २८ मे, २०२४.

**प्रस्तावना:-**

डोंबिवली औद्योगिक क्षेत्रातील अतिधोकादायक व धोकादायक रासायनिक कारखाने स्थलांतरीत करणे व तसेच विनापरवाना कारखाने बंद करण्यासंदर्भात मा. मंत्री (उद्योग) महोदय यांच्या अध्यक्षतेखाली दि. २८/०५/२०२४ रोजी आढावा बैठक संपन्न झाली. सदर बैठकीत उद्योग विभागासह महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, कामगार विभाग, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, बाष्पके संचालनालय, पोलीस व महसूल यंत्रणांसह स्थानिक प्राधिकरणाचे वरिष्ठ अधिकारी उपस्थित होते. वाढत्या नागरीकरणामुळे प्रस्तुत क्षेत्रामध्ये होत असलेल्या जटील समस्या ही बाब विचारात घेता, या अतिधोकादायक/ धोकादायक रासायनिक तसेच विनापरवाना उद्योगांचे स्थलांतरण करणे आवश्यक आहे. याबाबत सदर कंपन्यांच्या स्थलांतरणाकरिता निकष प्राधान्याने ठरविण्यासाठी तसेच तद्नुषंगिक बाबीं संदर्भात अहवाल सादर करण्याकरिता कृती आराखडा (Action Plan) समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

डोंबिवली ओद्यागिक क्षेत्रातील अतिधोकादायक/ धोकादायक रासायनिक कंपन्यांच्या स्थलांतरणाच्या प्रस्तावास मऔवि महामंडळाच्या संचालक मंडळाच्या दि. ३१/०१/२०२२ रोजीच्या बैठकीमध्ये ठराव क्र. ६४११ अन्वये मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्यानुसार पारित केलेल्या ठरावानुसार कृती आराखडा (Action Plan) तयार करणेसाठी खालीलप्रमाणे कृती आराखडा समितीची स्थापना करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | सदस्य |
|---|---|---|
| १. | प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई. | अध्यक्ष |
| २. | मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, अंधेरी, मुंबई. | सदस्य |
| ३. | विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ४. | सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई. | सदस्य |
| ५. | आयुक्त (कामगार), बांद्रा- कुर्ला संकुल, वांद्रे (पू.), मुंबई. | सदस्य |
| ६. | संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई. | सदस्य |
| ७. | संचालक, बाप्पके संचालनाय, कामगार भवन, बांद्रा- कुर्ला संकुल, वांद्रे (पू.), मुंबई. | सदस्य |
| ८. | आयुक्त, अन्न व औषध प्रशासन, बांद्रा- कुर्ला संकुल, वांद्रे (पू.), मुंबई. | सदस्य |
| ९. | आयुक्त, कल्याण- डोंबिवली महानगरपालिका, जि. ठाणे | सदस्य |

| **अ.क्र.** | **पदनाम** | **सदस्य** |
|---|---|---|
| १०. | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र औद्योगिक वसाहत मर्यादित, अंधेरी, मुंबई | सदस्य |
| ११. | सह सचिव (उद्योग-१४), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य सचिव |

२. सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील :-

I. डोंबिवली औद्योगिक क्षेत्राच्या सभोवतालील रहिवाशी भागापासून ५० ते १०० मीटरच्या परिघातील अतिधोकादायक/ धोकादायक रासायनिक तसेच विनापरवाना/ बंद कारखाने यांचे सर्व्हेक्षण करुन त्यांचे खालीलप्रमाणे “अ” “ब” व “क” असे वर्गीकरण करणे.

| | |
|---|---|
| “अ” | तातडीने स्थलांतरण/रुपांतरीत करण्यासाठी अत्यावश्यक असलेल्या कारखान्यांची यादी. |
| “ब” | पुढील २ वर्षात स्थलांतरीत/ रुपांतरीत करणे आवश्यक असलेल्या कारखान्यांची यादी. |
| “क” | पुढील ५ वर्षात स्थलांतरीत/ रुपांतरीत करणे आवश्यक असलेल्या कारखान्यांची यादी. |

II. वरील तक्त्यात नमूद वर्गीकरणानुसार स्थलांतरणासंदर्भात सविस्तर निकष ठरविणे तसेच स्थलांतरणासाठी सुयोग्य क्षेत्र निश्चित करणे.

III. ज्या कारखान्यांना त्यांच्या उत्पादनात बदल करावयाचा आहे, तो बदल सुकरतेने होईल यासंदर्भात उपाययोजना करणे व त्यासाठी कालमर्यादा निश्चित करणे.

IV. ज्या कारखान्यांना उत्पादनात बदल करावयाचा नाही त्यांना अन्यत्र स्थलांतरीत करताना द्यावयाच्या विविध सोई-सुविधा संदर्भात शिफारस करणे व त्यासाठी कालमर्यादा विहीत करणे.

V. वरील कार्यकक्षेसह समितीस योग्य वाटतील अशा अन्य उपाययोजना संदर्भात शासनास शिफारस करण्याची मुभा राहील.

३. सदर समितीने तीन आठवडयाच्या आत अहवाल शासनास सादर करावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०५२९१५१०४४६८१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY SHAMKANT DEGAONKAR

Digitally signed by SANJAY SHAMKANT DEGAONKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=56CF8C8577584ADC42F070185C585C41084CC34F6683553D21CCACBFA33D4D1F, cn=SANJAY SHAMKANT DEGAONKAR
Date: 2024.05.29 15:25:46 +05'30'

**( संजय देगांवकर )**
**शासनाचे सह सचिव**

**प्रत :-**

१) मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव,
२) मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
३) मा. प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, अंधेरी, मुंबई.
५) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

६) सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई.
७) आयुक्त (कामगार), बांद्रा- कुर्ला संकुल, वांद्रे (पू.), मुंबई.
८) संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई.
९) संचालक, बाष्पके संचालनाय, कामगार भवन, बांद्रा- कुर्ला संकुल, वांद्रे (पू.), मुंबई.
१०) आयुक्त, अन्न व औषध प्रशासन, बांद्रा- कुर्ला संकुल, वांद्रे (पू.), मुंबई.
११) आयुक्त, कल्याण- डोंबिवली महानगरपालिका, जि. ठाणे.
१२) सह सचिव (उद्योग-१४), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय. यांचे स्वीय सहायक.
१३) निवडनस्ती (उद्योग-१४).